महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतीगृहासाठी सहायक अनुदान या योजनेसाठी निधी वितरण.
लेखाशिर्ष-२२२५०५३९

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी २०२२/प्र.क्र.६५/अर्थसंकल्प (विघयो),**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०९ मे, २०२२

**संदर्भ : -**

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२
२. शासन निर्णय क्र.बीसीएच-२०१८/प्र.क्र.७९/शिक्षण-२, दि.०३.०३.२०१९
३. शिक्षण-२ कार्यासनाची नस्ती क्र.बीसीएच २०२२/प्र.क्र.१२४/शिक्षण-२

**प्रस्तावना -**

वित्त विभागाकडून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतीगृहासाठी सहायक अनुदान या योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानाचा निधी नियंत्रक अधिकारी ( आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षातील सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागासाठी अर्थसंकल्पित झालेला व वित्त विभागाकडून BEAMS प्रणालीवर प्राप्त झालेला महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतीगृहासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२२५०५३९) या योजनेचा निधी रु.९८०.०० लाख नियंत्रक अधिकारी ( आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च “मागणी क्र.एन-३, २२३५२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३ नागरी हक्क अधिनियमाच्या अंमलबजावणीकरिता यंत्रणा, २७७ शिक्षण, (०८) जिल्हा परिषदांना सहायक अनुदाने. (०८) (०१) महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतीगृहासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२२५०५३९) या लेखाशिर्षातील सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला उपरोक्त निधी / अनुदान वित्त विभागाच्या दि.४.४.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय अर्थसंकल्प नियम पुस्तिका नियम १७ व नियम १४२, तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील उपविभाग-एक नियम क्र. १४९ आणि वित्त विभागाचा शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०९१७१३३३२९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.05.09 17:16:20 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) यांचे स्वीय सहायक
२. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय/ विशेष सहाय्य) यांचे स्वीय सहायक
३. अप्पर मुख्य सचिव (सामाजिक न्याय व विशेष) यांचे स्वीय सहायक
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर
६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. आयुक्त (समाजकल्याण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सहसचिव / उपसचिव (शिक्षण-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. वित्त विभाग (व्यय-१४ / अर्थसंकल्प - ७) मंत्रालय, मुंबई
१४. कक्ष अधिकारी (शिक्षण-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवड नस्ती, कार्यासन अर्थसंकल्प, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.